**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील ‘उप अभियंता’ (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने केलेल्या नियुक्तीस, महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-११२४/ सं. क्र.१३७४/प्र. क्र. ९२/नवि-२८**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक:- २४ एप्रिल, २०२५**

**संदर्भ:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.मिभाम-१११६/प्र.क्र.३६(भाग-१)/१६/नवि-२८, दि.२६.०२.२०१९.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. मिभाम-१११६/प्र.क्र.३५/नवि-२८, दि.२८.०५.२०१९.
३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मिभा/मनपा/आस्था/१६६४/२०२४-२५. दि.०३.०९.२०२४.
४) मिरा-भाईंदर महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. १२६, दि.२२.०८.२०२४.

प्रस्तावना-

मिरा-भाईंदर महानगरपालिकेचा आकृतीबंध दि.२६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला आहे. तसेच, मिरा-भाईंदर महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ ला दि.२८.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरून दि.१२.०८.२०२४ च्या आदेशान्वये, श्री. सचिन लक्ष्मण पवार, श्रीमती प्रांजल शैलेश कदम, श्री. सतिश जे. तांडेल, श्री. राजेंद्र बा. पांगळ, श्री. अरविंद ह. पाटील व श्री. भुपेश द. काकडे ‘शाखा अभियंता’ (स्थापत्य) यांना, जेष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७, तसेच, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून ‘उप अभियंता’ (स्थापत्य), या पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे. या पदोन्नतीस/पदस्थापनेस, महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार, महानगरपालिकेने शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव दि.०३.०९.२०२४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. त्याअनुषंगाने मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील “शाखा अभियंता” (स्थापत्य), श्री. सचिन लक्ष्मण पवार, श्रीमती प्रांजल शैलेश कदम, श्री. सतिश जे. तांडेल, श्री. राजेंद्र बा. पांगळ, श्री. अरविंद ह. पाटील व श्री. भुपेश द. काकडे यांच्या ‘उप अभियंता’

(स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने केलेल्या नियुक्तीस, शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचेकडून संदर्भीय दि.०३.०९.२०२४ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव, मिरा-भाईंदर महानगरपालिका विभागीय पदोन्नती निवड समितीची दि.०८.०८.२०२४ रोजीची शिफारस, सदर शिफारशीस प्रशासकीय ठराव क्र. १२६, दि.२२.०८.२०२४ द्वारे दिलेल्या मान्यतेनुसार दि.१२.०८.२०२४ च्या आदेशान्वये, महानगरपालिका आस्थापनेवरील “शाखा अभियंता” (स्थापत्य), श्री. सचिन लक्ष्मण पवार, श्रीमती प्रांजल शैलेश कदम, श्री. सतिश जे. तांडेल, श्री. राजेंद्र बा. पांगळ, श्री. अरविंद ह. पाटील व श्री. भुपेश द. काकडे यांना जेष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ तसेच, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून ‘उप अभियंता’ या पदावर पदोन्नतीने दिलेल्या नियुक्तीस, मिरा-भाईंदर महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ मधील तरतूदीनुसार, शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०४२४१३१६१०४०२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2025.04.24 13:17:04 +05'30'

**(सुशिला पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जि. ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि-२) महोदयांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (नवि-२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती नवि-२८